**केंद्र शासन पुरस्कृत कमी खर्चाच्या स्वच्छता योजनेअंतर्गत राज्याच्या नागरी भागातील आर्थिक दुर्बल घटकांकरीता वैयक्तिक शौचालय बांधकामाच्या प्रस्तावासंदर्भात केंद्र हिश्याची रक्कम वितरीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्र.कखयो२००९/प्र.क्र. २५६/वै.शौ./पापु२१**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक - १७, फेब्रुवारी,२०१०

वाचावे:-

१) शासन निर्णय क्र. कखयो२००९/प्र.क्र.१००/वै.शौ./पापु२१ दिनांक १०/९/२००८

२) शासन निर्णय क्र.कखयो२००८/प्र.क्र.३९/पापु२१ दिनांक १६/६/२००८

३) शासन परिपत्रक क्र.कखयो२००८/प्र.क्र. १३३/वै.शौ./पापु२१ दिनांक २३/१०/२००८

४) शासन परिपत्रक क्र. कखयो२००८/प्र.क्र. ८६/वै.शौ./पापु२१ दिनांक ६/५/२००९

५) शासन पत्र क्र. क्र.कखयो२००९/प्र.क्र. १ /पापु२१ दिनांक १५/१/२००९

६) शासन पत्र क्र. LCS२००९/C.R.१/Ws२१ दि.२२/१/२००९

७) सचिव ,भारत सरकार,आवास व शहरी गरीबी उपशमन मंत्रालय,निर्माण भवन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.Z-१६०२४/३/२००७-LCS, दि.२२/६/२००९

८) अवर सचिव ,भारत सरकार,आवास व शहरी गरीबी उपशमन मंत्रालय,निर्माण भवन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.O-१७०२४/१९/२००९-LCS दि.२२/६/२००९

९) शासन निर्णय क्र.कखयो२००९/प्र.क्र. १९९/वै.शौ./पापु२१, दिनांक २१/८/२००९

**१०) कक्ष अधिकारी, वित्त विभाग यांचे ज्ञापन क्र.आकनि-११.१०/४८/अर्थसंकल्प - १८,दि.५/२/२०१०**

**प्रस्तावना :-**

राज्याच्या नागरी भागातील (महानगरपालिका व नगरपरिषद क्षेत्र) आर्थिक दुर्बल घटकातील नागरिकांकरिता वैयक्तीक शौचालय नसलेल्या प्रत्येक घरांमध्ये वैयक्तिक शौचालयांची उपलब्धता व्हावी यासाठी केंद्र शासन पुरस्कृत कमी खर्चाच्या स्वच्छता योजनेअंतर्गत सुधारित मार्गदर्शक तत्वांनुसार वैयक्तिक शौचालय बांधकाम कार्यक्रम राज्यातील सर्व शहरांमध्ये राबविण्याचा निर्णय **शासन निर्णय क्र. कखयो२००९/प्र.क्र.१००/वै.शौ./पापु२१ दिनांक १०/९/२००८** अन्वये घेण्यात आलेला आहे. सदर कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय क्र. **.कखयो२००९/प्र.क्र. १९९/वै.शौ./पापु२१, दिनांक २१/८/२००९ अन्वये नगरपरिषद आष्टा, जि. सांगली व नगरपरिषद उरण-इस्लामपूर, जि. सांगली** या दोन्ही नगरपरिषदांच्या वैयक्तिक शौचालयाच्या बांधकाम प्रस्तावांना मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. केंद्र शासनाच्या नगर विकास व शहरी द्रारीद्रय निर्मुलन मंत्रालयाच्या समन्वय समितीच्या दि.२६ मे, २००९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये वरील दोन्ही नगरपरिषदांचे प्रकल्प प्रस्ताव मंजूर करुन संदर्भाधिन क्रमांक ८ च्या दि.२२ जून, २००९ च्या पत्रान्वये सदर नगरपरिषंदाच्या प्रकल्प प्रस्तावापोटी एकुण केंद्र हिश्श्याच्या २५% रक्कम म्हणजेच रु.८५.०० लक्ष राज्याच्या एकत्रित निधीत जमा केली आहे. सदर रक्कम अर्थसंल्पित होऊ शकलेली नसल्याने हा निधी लाभार्थ्यापर्यंत तात्काळ पोहचविण्यासाठी आकस्मिकता निधीतून अग्रिम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

वरील बाबींचा विचार करुन या शासन निर्णयान्वये संदर्भाधिन क्र.१० च्या वित्त विभागाच्या ज्ञापनाव्दारे **रु.८५,००,०००/- (रुपये पंच्यांऐंशी लक्ष फक्त ) आकस्मिकता निधीव्दारे मंजुर करण्यात आलेल्या अग्रिमाची रक्कम लाभार्थ्यांना केंद्र हिश्यापोटी देण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण या समन्वय यंत्रणेकडे सुपुर्द करण्यास** मान्यता देण्यात येत आहे.

नगर परिषद आष्टा, जिल्हा सांगली यांचा २६५० शौचकूपांचा रु.२६५.०० लक्ष व नगर परिषद उरण-इस्लामपूर, जिल्हा सांगली यांचा १८०२ शौचकूपांचा रु.१८०.२० लक्ष किंमतीच्या प्रकल्प प्रस्तावा संदर्भातील वित्तीय आकृतीबंध खालीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | नगर परिषदेचे नाव | सीटस्ची संख्या | प्रति सीट मुल्य (रु.) | केंद्र शासनाने प्रति सीट निर्धारित केलेल्या मुल्यापेक्षा अधिक रक्कम असल्यास | प्रकल्प प्रस्तावाची एकूण किंमत (रु.लाखांत) | केंद्र शासनाचा हिस्सा (रु.लाखांत) | राज्य शासनाचा हिस्सा (रु.लाखांत) | लाभार्थ्यांचा हिस्सा (रु.लाखांत) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | आष्टा | २६५० | ११,९००/- | संबंधित नागरी संस्था अथवा लाभार्थ्यामार्फत | २६५.०० | १९८.७५ | ३९.७५ | २६.५० |
| २. | उरण-इस्लामपूर | १८०२ | ११,९००/- | संबंधित नागरी संस्था अथवा लाभार्थ्यामार्फत | १८०.२० | १३५.१५ | २७.०३ | १८.०२ |

२. केंद्र शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या पहिल्या २५% हप्त्याच्या अनुषंगाने, आष्टा व उरण-इस्लामपूर या दोन्ही नगर परिषदांना केंद्र शासनाच्या हिश्श्यापैकी पहिले २५% इतके अनुदान खाली नमूद केलेल्या वित्तीय आकृतीबंधानुसार नगरपरिषद आष्टा, जि. सांगली व नगरपरिषद, उरण-इस्लामपूर, जि. सांगली यांना वितरीत करण्यास शासन या शासन निर्णयान्वये मान्यता देत आहे.

**(पूर्ण रुपयांत)**

| नगरपरिषदेचे नांव | शौचालयांची संख्या | एकूण प्रकल्प खर्च | केंद्र हिश्याची रक्कम (७५%) | अशासकीय संस्था हिस्सा (प्र. प्र. च्या १.५%) | अशासकीय संस्था केंद्र हिस्सा स्तंभ ५ च्या (५/६) | एकूण कंद्र अनुज्ञेय अनुदान (७५% +५/६ अ.शा.सं.हिस्सा) | वितरीत करावयाचे केंद्र हिश्याचे २५% अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| आष्टा, जिल्हा सांगली | २६५० | २,६५,००,००० | १,९८,७५,००० | ३,९७,५०० | ३,३१,२५० | २,०२,०६,२५० | ५०,५१,५६२.५ |
| उरण - इस्लामपूर जिल्हा सांगली | १८०२ | १,८०,२०,००० | १,३५,१५,००० | २,७०,३०० | २,२५,२५० | १,३७,४०,२५० | ३४,३५,०६२.५ |

३. केंद्र हिश्याचे उपरोक्त नमूद केलेले २५% अनुदान या कार्यक्रमांतर्गत समन्वय यंत्रणा म्हणून घोषित करण्यात आलेल्या महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने आष्टा व उरण-इस्लामपूर या दोन्ही नगरपरिषदांना सदर अनुदान मुक्त करण्याची कार्यवाही करावी.

४. वर मुक्त करण्यात आलेला निधी मिळविण्यासाठी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे सदस्य सचिव किंवा प्राधिकरणाचे वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी (श्री.प्र.बा.पांढरीपांडे) यांच्या सहीने तयार केलेले आणि उप सचिव (श्रीमती सु.वि.कोळेकर) यांनी प्रतिस्वाक्षरी केले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. सदर रक्कमेचा धनादेश महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे नावे देण्यात यावा.

५. संबंधित आष्टा व उरण-इस्लामपूर या नगरपरिषदांनी या रक्कमांचे स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेच्या प्रगतीचा त्रैमासिक अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे नियमितपणे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण या समन्वय यंत्रणेमार्फत शासनास सादर करावीत.

६. राज्याचा नागरी भाग हागणदारी मुक्त होण्याच्या दृष्टीने कमी खर्चाच्या स्वच्छता योजनेअंतर्गत राबविण्यात येणारा सदर वैयक्तिक शौचालय बांधकाम कार्यक्रम यशस्वी होणे अत्यंत आवश्यक आहे. त्यामुळे उक्त नागरी संस्थांनी या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकडे काटेकोरपणे लक्ष देऊन तो विहीत कालमर्यादेत पूर्ण होईल याची यथायोग्य दक्षता घ्यावी.

७. वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.१० च्या ज्ञापन क्र.आकनि -११.१०/४८/अर्थसंकल्प - १८,दि.५/२/२०१० अन्वये आकस्मिकता निधीमधून मंजूर केलेली रक्कम रु.८५,००,०००/- (रुपये पंच्यांऐंशी लक्ष फक्त ) सन २००९-१० या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक वाय - २, लेंखार्शीर्ष २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, ०२- मलनिस्सारण व स्वच्छता पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०१) (०४), महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास कमी खर्चाच्या स्वच्छता कार्यक्रमासाठी सहाय्यक अनुदान, (२२१५ ९०८५) (केंद्र हिस्सा), ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. याकरिता आकस्मिकता निधी संकेतांक (८००० ५००७) असा आहे.

८. **या संबंधिचे देयके कोषागारात सादर करतांना त्यावर लाल शाईने आकस्मिकता निधी अग्रीम,शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक आकनि-११.१०/४८/अर्थसंकल्प-१८ दिनांक ५.२.२०१०,आकस्मिकता निधी संकेतांक (८००० ५००७) अन्वये मंजूर असे लिहावे.** सदर आकस्मिकता निधीची परितूर्ती विधानमंडळाचे आगामी अर्थसंकल्पिय अधिवेशन मार्च २०१० मध्ये पुरक मागणीव्दारे करण्यात येईल.

९. शासन परिपत्रक वित्त क्र.सीएनएफ १०८३/ १४०/अर्थसंकल्प-३, दि.२६ एप्रिल, १९८३ व शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.सीएनएफ १०८६/१५३/अर्थसंकल्प, दि.२८ ऑगस्ट, १९८६ याव्दारे केलेल्या सूचनांची अंमलबजावणी काटेकोरपणे करावी.

१०. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने उक्त उपलेखाशिर्षाखालील तरतूदीतून या शासन निर्णयात परिच्छेद २ मधील स्तंभ क्र. ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधीत नगरपरिषदांना अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही तात्काळ करावी.

११. हा शासन निर्णय वित्त विभागाचे ज्ञापन क्र.आकनि ११.१०/४८/अर्थसंकल्प - १८ दि. ५ फेब्रुवारी, २०१० च्याअन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०१००२१७१३४६५८००१** असा आहे**.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**( सु. वि. कोळेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**१. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई-४०० ०२१**

२. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,सिडको भवन,बेलापूर,नवी मुंबई.
३. संचालक, नगरपालिका प्रशासन, वरळी, मुंबई
४. विभागीय आयुक्त ( पुणे)
५. जिल्हाधिकारी ( सांगली)
६. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नविन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई (२ प्रती)
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखाधिकारी,मुंबई.
११. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रादेशिक प्रमुख, हूडको विभागीय कार्यालय, श्रेयस चेंबर्स, २ रा मजला, १७५ डी.एन.रोड, फोर्ट, मुंबई ००१
१३. मुख्याधिकारी / अध्यक्ष , नगर परिषदा ( आष्टा व उरण-इस्लामपूर)
१४. वित्त विभाग(व्यय३ , अर्थसंकल्प ३, १८ व १९), (एकुण ४ प्रती)मंत्रालय, मुंबई
१५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधान भवन, मुंबई
१७. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र.पापु-०४ व २०.
१८. निवड नस्ती, कार्यासन .क्र.पापु-२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१९. संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग